**महाराष्ट्र राज्य लॉटरी च्या विविध सोडतींचे निकाल वृत्तपत्र या माध्यमातून प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः मरालॉ २०१८/प्र.क्र.९७ /लॉटरी २**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २४ डिसेंबर, २०१८

वाचा : १. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. मरालॉ २०१३/ प्र.क्र.११३ /लॉ-२, दि.१८/१२/२०१३.
२. वित्त विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. मरालॉ २०१३/ प्र.क्र.११३ /लॉ-२, दि.२९/०३/२०१४.
३. उपसंचालक (वित्त व लेखा),महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई यांचे पत्र क्र. उपसं(विव ले)/मरालॉ /योजना/३६२८/१८, दि. २९ ऑक्टोबर,२०१८.

**शासन परिपत्रक :**

महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या विविध सोडतींचे निकाल वृत्तपत्र या माध्यमातून प्रसिध्द करण्याबाबत संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय क्र. मरालॉ २०१३/ प्र.क्र.११३ /लॉ-२, दि.१८/१२/२०१३ अन्वये अटी व शर्ती विहित केलेल्या आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१ मधील " महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या सर्व सोडतींचे निकाल प्रसिध्दीचे आकारमान कमीत कमी ११२ चौ .से.मी .इतके असेल." ही अट क्र ४.रद्द करण्यात येऊन त्या ऐवजी **"महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या सर्व सोडतींचे निकाल प्रसिध्द करताना सुस्पष्ट व ठळक दिसेल इतक्या आकारमानात वर्तमानपत्रांमध्ये असेल. सोडतीचा निकाल राज्याच्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या वितरण धोरणानुसार आणि संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णय, दि.१८/१२/२०१३ व शासन शुध्दीपत्रक, दि. २९ / ०३/ २०१४ अन्वये विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार वर्तमानपत्रांमध्ये प्रसिध्दीसाठी येणारा प्रत्यक्ष एकूण खर्च किंवा DGIPR /DAVP यांच्या दरानुसार येणारा एकूण खर्च किंवा रू.१५,०००/- (रू .पंधरा हजार फक्त ) यापैकी जी रक्कम कमी असेल ती रक्कम सर्व वर्तमानपत्रांमध्ये निकाल प्रसिध्दीच्या एकूण खर्चाची प्रतिपूर्ती म्हणून सदरचे परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अभिकर्त्यांस/घाऊक विक्रेत्यास अनुज्ञेय राहील."** अशी नवीन अट लागू करण्यात येत आहे.

२. शासन निर्णय क्र. मरालॉ २०१३/ प्र.क्र.११३ /लॉ-२, दि.१८/१२/२०१३ मधील इतर सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१२२६१५०५३९८८०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Kundalik Avhad

Digitally signed by Madhav Kundalik Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33f159af855e668523427acf7322c4c3427aed8bf6b0bf7eb4dfdd5490c3d843, cn=Madhav Kundalik Avhad
Date: 2018.12.26 15:15:44 +05'30'

**( माधव आव्हाड )**
कक्ष अधिकारी तथा राज्य लॉटरी अधिकारी.

**प्रति,**

१. मा. मंत्री ( वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (गृह), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.

३. मा. राज्यमंत्री( वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. अपर मुख्य सचिव, (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. आयुक्त, राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
८.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहायक.
९. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
१२. सह सचिव (राज्य लॉटरी) वित्त विभाग यांचे स्वीय सहायक.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी,वाशी, नवीमुंबई.
१६. कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/ आर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
लेखाधिकारी, लॉटरी संचालनालय,
१७. निवड नस्ती, लॉटरी -२.